सन २०१६-१७ करीता महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा योजनांतर्गत (MEMS) कार्यान्वित सुसज्ज रुग्णवाहीकांवरील आवर्ती खर्चासाठी सर्वसाधारण योजनेंतर्गत निधी उपलब्ध करुन देण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ईएमएस-२०१७/प्र.क्र.८२ / आरोग्य -३

१० वा मजला , गो.ते. संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २९ मार्च ,२०१७

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः इएमएस-२०११/प्र.क. २२४/आरोग्य-३, दिनांक २८ मार्च, २०१३.
२) शासन शुध्दिपत्रक, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः इएमएस-२०११/ प्र.क. २२४/आरोग्य-३, दिनांक २२ ऑक्टोबर, २०१४.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पीएचडी-३००११/ प्र.क्र. ४५४/ आरोग्य ७, दिनांक २७ मे, २०१६
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पीएचडी-३००११/ प्र.क्र. ३८७/ २०१६/ आरोग्य ७, दिनांक १५ जून, २०१६
५) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः पीएचडी-३००११/प्र.क्र.४५४/ २०१६/ आरोग्य ७, दिनांक २९ जून, २०१६
६) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०१६/प्र.क्र.२१८/ आरोग्य ३, दिनांक १ सप्टेंबर, २०१६
७) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः ईएमएस-२०१६/प्र.क्र.२१८/ आरोग्य ३, दिनांक ०५ नोव्हेंबर, २०१६ व ३० नोव्हेबर २०१६
८) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/टे ४/अनु.वितरण/१६-१७/२६२३/२०१७, दिनांक .०३.२०१७.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा प्रकल्प योजनेस शासन निर्णय, दिनांक २८ मार्च, २०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजना सन २०१३-१४ मध्ये दिनांक २६ जानेवारी, २०१४ पासून कार्यान्वित करण्यात आली. सदर शासन निर्णयानुसार या योजनेस सन २०१४-१५ व २०१५-१६ मध्ये काही प्रमाणात राष्ट्रीय आरोग्य अभियानामार्फत अनुदान प्राप्त

होत होते आणि उर्वरित अनुदान राज्य योजनेतून वितरीत करण्यात येत होते. उपरोक्त दिनांक १५ जून, २०१६ च्या शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ पासून सदर योजना राष्ट्रीय आरोग्य अभियाना कडून संचालक, आरोग्य सेवा यांच्याकडे हस्तांतरीत करण्यात आली आहे. यास्तव सन २०१६-१७ पासून या योजनेंतर्गत आवर्ती खर्चासाठी आवश्यक निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार अ. क्र.६ व अ. क्र.७ येथील शासन निर्णयान्वये या योजनेअंतर्गत करावयाच्या आवर्ती खर्चासाठीची मासिक देयक वितरीत करण्यास वेळोवेळी मान्यता देण्यात आलेली आहे.

**शासन निर्णय :-**

आता या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवा योजनेवरील रुग्णवाहिकांवरील आवर्ती खर्चासाठी केंद्र शासनाच्या Approveed PIP २०१६-१७, FMR code B -१२ अंतर्गत महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवेसाठी मंजूर असलेल्या रु.१८.२७ कोटी इतक्या निधीपैकी रुग्णवाहिका आवर्ती खर्चासाठी मंजूर असलेल्या रु.१४.१६ कोटी इतक्या निधीमधून माहे, डिसेंबर २०१६ चे रु.२०,००,७०,८९२/- इतक्या देयकाच्या ७० टक्के देयक रु.१४,००,४९,६२४/- व माहे जानेवारीच्या रु.१९,९९,४७,२०८/-च्या ७० टक्के देयक रु.१३,९९,६३,०४६/- मधील रु.१५,५०,३७६/- अशी एकूण रु.१४.१६ कोटी एवढी रक्क़म अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. शासन परीपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं -२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ मधील परिच्छेद क्र. ७ ते १८ व सोबतच्या परिशिष्टामधील अनु. क्र. ३ व ९ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. या पुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीचे लेखा परिक्षण झालेले नसल्यामुळे लेखा परिक्षण / महालेखापाल यांचे आक्षेप उपलब्ध नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमाशी संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च करण्यात येणार आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

३. याबाबतचा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियान (एन.एच.एम.) अंतर्गत आकस्मिक वैद्यकीय सेवा (MEMS) या योजनेअंतर्गत पीआयपी सन २०१६-१७ या वर्षात महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवा योजनेवरील रुग्णवाहिकांवरील आवर्ती खर्चासाठी रु.१४.१६ कोटी इतक्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात येईल .

४. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर अनुदानासाठी सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र. क्र. अर्थसं -२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१२४३००९६१७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Rambhaji Dahiphale

Digitally signed by Vivek Rambhaji Dahiphale
DN: CN = Vivek Rambhaji Dahiphale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2017.03.29 19:59:07 +05'30'

**(विवेक दहिफळे)**
**सह सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे.
६. सहाय्यक संचालक (लेखा व लेखा परिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०.नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
११.वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.

